**श्री.शिवाजी तुकाराम काटकर, अधिव्याख्याता, यांचे निलंबन रद्द करुन त्यांना सेवेत पुन:स्थापित करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्र. विभाचौ-४२१८/प्र.क्र.७४/१८/तांशि-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय-विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १० फेब्रुवारी, २०२०

संदर्भ: १) शासन आदेश क्र. संकिर्ण-२०१५/प्र.क्र.१५/१५/आस्था-२, दि. १४ जून, २०१६.
२) शासन आदेश क्र. विभाचौ-४२१८/प्र.क्र.७४/१८/तांशि-७, दि.१३ एप्रिल, २०१८.
३) शासन आदेश क्र. संकिर्ण-११९९/प्र.क्र.०९/१९/तांशि-७, दि. १२ फेब्रुवारी, २०१९.
४) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.निप्रआ-१११८/प्र.क्र.११/११-अ, दि. ०९ जुलै, २०१९.

प्रस्तावना:

श्री. शिवाजी तुकाराम काटकर, अधिव्याख्याता, स्थापत्य अभियांत्रिकी हे शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर येथे कार्यरत असतांना त्यांचेविरुध्द लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने केलेल्या कारवाईच्या अनुषंगाने त्यांना संदर्भ क्र.२ येथील आदेशान्वये निलंबीत करण्यात आले व संदर्भ क्र. ३ येथील आदेशान्वये त्यांच्यावर मा. न्यायालयात अभियोग दाखल करण्यात मान्यता देण्यात आली. त्यानुसार श्री. काटकर यांचेविरुध्द लाचलुचपत विभागाने मा. विशेष न्यायाधीश व जिल्हा सत्र न्यायालय, कोल्हापूर येथे दि. ०१ एप्रिल, २०१९ रोजी आरोपपत्र दाखल करुन क्र. ०६/२०१९ अन्वये खटला दाखल केला असून सदर प्रकरण न्यायप्रविष्ठ आहे.

परंतु श्री. काटकर यांच्या निलंबनाचा कालावधी ०१ वर्षापेक्षा अधिक झालेला आहे व ९० दिवसांपेक्षा जास्त कालावधी निलंबनाखालील कर्मचाऱ्याचे निलंबन रद्द करुन सेवेत पुन:स्थापित करण्याबाबत मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपील क्र. १९१२/२०१५ च्या अनुषंगाने दि. ११ सप्टेंबर, २०१८ रोजी आदेश पारित केले आहेत. तसेच मा. सर्वोच्च न्यायालयाचे उक्त आदेश विचारात घेऊन सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णय निर्गमित केलेला आहे. सदर सर्व बाबींचा विचार करुन संदर्भ क्र. ०१ येथील शासन निर्णयानुसार सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या निलंबन आढावा समितीच्या दि. २१ ऑगस्ट, २०१९ रोजी घेण्यात आलेल्या बैठकीत श्री. काटकर यांचे निलंबन रद्द करुन त्यांना सेवेत पुन:स्थापित करण्याच्या प्रस्ताव निर्णयार्थ ठेवण्यात आला. सदर समितीने श्री. काटकर यांना सेवेत पुन:स्थापित करुन पदस्थापना करण्यास सहमती दर्शविली, त्यानुसार श्री. काटकर यांचे निलंबन रद्द करुन सेवेत पुन:स्थापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन आदेश :

श्री. शिवाजी तुकाराम काटकर, अधिव्याख्याता, स्थापत्य अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर यांचे संदर्भ क्र.२ येथील शासन आदेशान्वये केलेले निलंबन, त्यांच्या विरुध्द मा. विशेष न्यायाधीश व जिल्हा सत्र न्यायालय, कोल्हापूर येथील प्रविष्ठ न्यायालयीन प्रकरणाच्या (०६/२०१९) अंतिम निर्णयाच्या अधिन राहून संपुष्टात आणण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. श्री. काटकर यांना शासन सेवेत पुन:स्थापित केल्यानंतर त्यांची पदस्थापना प्रशासकीय कारणास्तव शासकीय तंत्रनिकेतन, साकोली येथील रिक्त पदावर करण्यात येत आहे.

**०२.** हे आदेश तात्काळ अंमलात येतील. श्री. काटकर यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, नागपूर यांनी त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

**०३.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२१०१७१११११४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2020.02.10 17:13:04 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. शिवाजी तुकाराम काटकर, अधिव्याख्याता, स्थापत्य अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
४) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५) सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, पुणे/नागपूर,
६) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर/साकोली,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
८) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर/भंडारा,
९) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन ११-अ), मंत्रालय, मुंबई-३२,
१०) निवडनस्ती (तांशि-७).